एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम - ६ राज्यसेवा (मुख्य) परिक्षा - २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयातंर्गत उद्योग उपसंचालक (तांत्रिक), गट-अ संवर्गातील उमेदवारांच्या परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधी करिता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत व त्यांच्या वेतनाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०२०/५९/प्र.क्र.१७/उद्योग-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २४ जानेवारी, २०२०

संदर्भ:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४
२) शासन निर्णय, उ.ऊ.व का. विभाग क्रमांक इएसटी २०१५/३९८/प्र.क्र.११०/उद्योग-३, दिनांक ७.१०.२०१५
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दिनांक २५.०९.२०१९
५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दिनांक ३१.१०.२०१९
६) शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१९/प्र.क्र.३०/सीपीटीपी-अ, दिनांक ७.०१.२०२०

प्रस्तावना:-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयातंर्गत उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ व उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट ब संवर्गाचा समावेश संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये करण्यास मान्यता देण्यात आली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम - ६ मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयातंर्गत उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ संवर्गातील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा - २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष रूजू झालेल्या २ उमेदवारांकरिता सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतनस्तर एस-२० (५६१०० - २०८७००) मध्ये एकूण २ अधिसंख्य पदे दिनांक ३०.०९.२०१९ ते ०३.१०.२०२१ या दोन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्याकरिता शासन मंजूरी देत आहे.

२. सदर २ अधिसंख्य पदे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. उद्योग संचालनालयातंर्गत उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ संवर्गातील सदर २ अधिसंख्य पदांच्या दिनांक ३०.०९.२०१९ ते ०३.१०.२०२१ या दोन वर्षांच्या कालावधीतील वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र.के-७ मुख्य लेखाशीर्ष, २८५२ - उद्योग, ८० - सर्वसाधारण, ००३, औद्योगिक शिक्षण, संशोधन व प्रशिक्षण (००)(०३) उद्योग विभागांअतर्गत प्रादेशिक कार्यालयामधील कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण (कार्यक्रम), ५० - इतर खर्च, (२८५२०५१४) (योजनांतर्गत योजना)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक दिनांक २५.०९.२०१९ व ३१.१०.२०१९ अन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-६ (सीपीटीपी-६) साठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या असून परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थीच्या वेतनाबाबत निर्देश दिले आहेत. त्यानुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम - ६ (सीपीटीपी-६) अंतर्गत प्रशिक्षण घेणा-या उद्योग संचालनालयातंर्गत उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ संवर्गातील २ उमेदवारांच्या परिविक्षाधीन कालावधीतील वेतनासंदर्भात पुढीलप्रमाणे आदेशित करण्यात येत आहे:-

अ) सीपीटीपी -६ अंतर्गत प्रशिक्षण घेणा-या उद्योग संचालनालयातंर्गत उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ संवर्गातील २ प्रशिक्षणार्थी / परिविक्षाधीन उमेदवारांच्या वेतनासाठी विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. तसेच सदर प्रशिक्षणार्थींचे सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, डीसीपीएस करीता क्रमांक घेण्याची कार्यवाही उद्योग संचालनालय, मुंबई यांच्याकडून करण्यात यावी.

ब) उपरोक्त २ परिविक्षाधीन उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ हे दिनांक ३०.०९.२०१९ ते २२.०३.२०२० या २४ आठवड्यांच्या कालावधीत यशदा, पुणे येथे प्रशिक्षण घेणार असून, सदर प्रशिक्षणार्थींना दि.३०.०९.२०१९ ते २२.०३.२०२० या कालावधीत द्यावयाच्या ठोक वेतनासाठी प्रति महिना प्रति अधिकारी रू.३०,०००/- याप्रमाणे एकत्रितरित्या अग्रिम निधी आहरण व संवितरण अधिकारी यांनी वनामती, नागपूर यांना विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी उपलब्ध करून द्यावा.

क) परिविक्षाधीन कालावधीतील खातेनिहाय तांत्रिक प्रशिक्षण या टप्प्याचे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर (एकूण २४ आठवड्यानंतर) प्रशिक्षणार्थी / परिविक्षाधीन उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट अ यांना विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी त्यांच्याकडे खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाच्या टप्प्यासाठी हजर झाल्यापासून या उमेदवारांना नियमित वेतन प्रदान करण्यात यावे. त्याचप्रमाणे आधीच्या २४ आठवड्यांच्या कालावधीत प्रशिक्षणार्थींना अदा करण्यात आलेली ठोक वेतनाची रक्कम आणि नियमित वेतन यामधील फरकाची रक्कम देखील एक रकमी अदा करावी. त्यासाठी अर्थसंकल्पीय अंदाज / सुधारित अंदाजामध्ये पुरेशी तरतूद उपलब्ध करुन घेण्यासाठी कार्यवाही करावी.

ड) सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ४ व ५ च्या परिपत्रकातील प्रशिक्षणार्थी / परिविक्षाधीन उमेदवारांच्या संदर्भातील अन्य तरतूदीनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यावर सोपविण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२४१३१७२२७७१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Jagatrao Kale

Digitally signed by Santosh Jagatrao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f2532e3222ba7f49d8a67dd10b00f555be2633055b547af40ebd3801efd71800, cn=Santosh Jagatrao Kale
Date: 2020.01.24 12:56:38 +05'30'

**(संतोष ज. काळे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई
७. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
८. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. उप सचिव( प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई (आवश्यक कार्यवाहीकरिता)
१२. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे.
१३. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती.